**सामूहिक कृषक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड, ता. डहाणू, जि.पालघर ही योजना सन २०१७-१८ पासून पूर्वलक्षी प्रभावाने बंद करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६६/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८**

वाचा :- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.शिप्रबो-११७३/१२९२७-बी, दि. १० मार्च, १९७५
२. विभागीय कृषि सहसंचालक, कोंकण विभाग यांचे पत्र क्र. विकृससं/साकृप्रको/कृषि-३/२९३/२०१८, दि. १७ जानेवारी, २०१८

प्रस्तावना :-

राज्यातील शेतक-यांना विशेषत: अनुसूचित जमातीच्या शेतक-यांना नविन शेती तंत्रज्ञानाचा तसेच शेतीशी संलग्न दुग्धव्यवसाय,कुक्कुटपालन इ. विषयासंबंधी प्रशिक्षणाद्वारे माहिती व तंत्रज्ञान अवगत करुन देण्याच्या उद्देशाने ठाणे जिल्हयात सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल या केंद्राची स्थापना सन १९७१ मध्ये करण्यात आली होती. त्याच परिसरात गोखले एज्युकेशन संस्थेमार्फत ग्रामीण सुविधा प्रशिक्षण केंद्र, सकस आहार योजना इत्यादी योजना कृषि विद्यापीठांच्या सौजन्याने चालविण्यात येत होत्या. सन १९७५ पासून कोसबाड येथील सामुहिक प्रशिक्षण केंद्र ही योजना १०० टक्के अनुदान तत्वावर गोखले एज्युकेशन संस्थेकडे दि. १० मार्च, १९७५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुपूर्द करण्यात आली होती.

राज्यातील कृषि विस्तार कार्यक्रमांना सुधारणा विषयक सहाय्य (आत्मा) या केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत तसेच कृषि विज्ञान केंद्र व कृषि विद्यापीठांच्या संशोधन केंद्रामार्फ़त शेतकऱ्यांसाठी विविध प्रशिक्षण कार्यक्रम राबविले जात आहेत. सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल ही योजना देखील शेतक-यांना प्रशिक्षण देण्याच्या उद्देशाने कार्यान्वित करण्यात आली होती. त्यामुळे उपरोक्त नमूद करण्यात आलेल्या योजना व सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि. पालघर योजना यांचा उद्देश शेतक-यांना प्रशिक्षण देणे असल्याने प्रस्तुत योजनांमध्ये द्विरुक्ती होत आहे. त्यामुळे सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल ही योजना बंद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सामूहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड,ता.डहाणू जि.पालघर ही योजना पूर्वलक्षी प्रभावाने सन २०१७-१८ पासून बंद करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१६५००१८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावान.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2018.10.10 16:55:44 +05'30'

**(अशोक आत्राम)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव ( कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
६. विभागीय कृषि सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे
७. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,पालघर जिल्हा,पालघर
८. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा पालघर
९. महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
१०.विभागीय आयुक्त,कोकण भवन,नवी मुंबई
११. मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.पालघर
१२.वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१३)(अर्थोपाय) ,मंत्रालय,मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन १४१४,१४३१ , मंत्रालय,मुंबई.३२
१४.कार्यासन अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
१५.प्रशिक्षण अधिकारी,सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र, गोखले एज्युकेशन सोसायटी, कोसबाड हिल, तालुका-डहाणू जि.पालघर
१६.निवड नस्ती , कार्यासन ३ अे